सन २०२१-२२ करिता प्रधान मंत्री कृषि सिंचन योजनेच्या अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रू. ३३.३३ कोटी निधी वितरीत करणे...

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

### शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-२०२२/प्र.क्र.५२(भाग-२)/१४अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ३० मार्च, २०२२

**संदर्भ :**

१. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र. ७-३/२०२०-आरएफएस -III, दि.१२ एप्रिल, २०२१.
२. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र. १७-४/२०२१-आरएफएस-III, दि.१० मे, २०२१.
३. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.प्रकृसिं-०५२०/प्र.क्र.५८/१४-अे, दि. ८ जून, २०२१.
४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.प्रकृसिं-०६२१/प्र.क्र.१०४/१४-अे, दि.२६ जुलै, २०२१.
५. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८अर्थ-३, दि. १४ ऑक्टोबर, २०२१
६. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.प्रकृसिं-०५२०/प्र.क्र.५८/१४-अे, दि. १९ जानेवारी, २०२२.
७. केंद्र शासनाच्या कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्र.१८-१०/२०२०-आरएफएस-III, दि. २२ फेब्रुवारी, २०२२
८. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. प्रकृसिं-२०२२/प्र.क्र.५२/१४-अे, दि. २४ फ़ेब्रुवारी, २०२१.
९. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र. बीयुडी-२०२१/प्र..क्र.०७/कार्यासन-६ दि. ३० मार्च, २०२२

**प्रस्तावना:**

प्रधान मंत्री कृषि सिंचन योजना केंद्र व राज्य शासनाच्या अनुक्रमे ६०:४० प्रमाणात अर्थसहाय्याने राबविण्यात येत असून या योजनेंतर्गत सन २०२१-२२ मध्ये अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र शासनाने संदर्भाधीन दि. २२ फ़ेब्रुवारी, २०२२ रोजीच्या पत्रान्वये राज्यास अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र हिस्याचा रू. २४ कोटी निधी वितरीत केला आहे. त्यानुसार केंद्र हिश्श्याचा रू २० कोटी निधी व त्या समरुप राज्य हिस्याचा रू. १३.३३ कोटी निधी असा एकूण रू. ३३.३३ कोटी निधी वितरणासाठी उपलब्ध असून तो निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ मध्ये प्रधान मंत्री कृषि सिंचन योजनेंतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रु. ३३.३३ कोटी (रुपये तेहेत्तीस कोटी तेहेत्तीस लाख फक्त)) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला रू. ३३.३३ कोटी निधी प्रधान मंत्री कृषि सिंचन योजनेच्या पुढील लेखाशिर्षांतर्गत सन २०२१-२२ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा.

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|---|
| **अनुसूचित जमाती** | मागणी क्रमांक टी -५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२७) प्रधान मंत्री कृषि सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) (केंपुयो)(केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ए६१९) ३३-अर्थसहाय्य | मागणी क्रमांक टी -५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१- जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (१२) प्रधान मंत्री कृषि सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक (सुक्ष्म सिंचन) (केंपुयो (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)<br>(२४०१ए४६८) ३३-अर्थसहाय्य |

३. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेल्या रू. ३३.३३ कोटी रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

४. सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी वितरीत केलेला रू. ३३.३३ कोटी निधी कोषागारातून आहरित करुन आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे उघडण्यात आलेल्या Single Nodal Account (SNA) मध्ये जमा करावा आणि तद्नंतर सदर निधी PFMS द्वारे जिल्हा अधिक्षक कृषि अधिका-यांकरिता उघडलेल्या Child Account द्वारे अनुसूचित जमाती प्रवर्गातील लाभार्थ्यांवर खर्ची टाकावा.

५. या योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड व अनुदान मंजुरीची कार्यवाही महा-डीबीटी प्रणालीद्वारे करावी आणि लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर अनुदानाची रक्कम सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीव्दारे जमा करावी.

६. वितरीत केलेला निधी खर्च करताना प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत - प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन दि. २६ जुलै, २०२१ च्या शासन निर्णयातील सूचना त्याचप्रमाणे केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि. १२ एप्रिल, २०२१ व दि.१० मे, २०२१ च्या पत्रातील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

७. सदर निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास पाठवून त्याची प्रत राज्य शासनास पाठविण्यात यावी.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या त्यांच्या अनौ. संदर्भ क्र. ९१/२२/व्यय-१, दि २८ मार्च, २०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस व आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णय दि. ३० मार्च, २०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०१७३१५७२४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPT., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, pseudonym=1CC019CBB7F0A77E397F15793DF809A69806ED98, serialNumber=D8D9626C9E038380CD235C048F20D7CE74CFFD3A95F2AC3C192E9C991F358271, cn=SHRIKANT C ANDGE
Date: 2022.03.31 11:20:28 +05'30'

**(श्रीकांत आंडगे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई,
२) मा. मंत्री (फ़लोत्पादन),मंत्रालय, मुंबई,
३) मा. राज्यमंत्री (कृषि),मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (फ़लोत्पादन),मंत्रालय, मुंबई,
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई,,
७) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) सचिव (आदिवासी विकास विभाग), आदिवासी विकास विभाग , मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) संचालक (सर्व), पुणे,
११) विभागीय कृषि सहसंचालक (सर्व),
१२) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१३) प्रधान महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
१४) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
१५) संचालक, लेखा व कोषागारे , मुंबई जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
१६) वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई,
१७) आदिवासी विकास विभाग (कार्या. ०९/०६), मंत्रालय, मुंबई,
१८) निवडनस्ती (१४-अे)